पोलीस दलातील पोलीस निरीक्षक(वर्ग-२)
व त्याखालील पोलीस अधिकारी/कर्मचारी
यांच्या विरुध्दच्या विभागीय चौकशीचे
कामकाज पोलीस विभागाकडे सुपूर्द
करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग.

क्रमांक : पीडीई-५८९१/१४७४/(२६८)/पोल-६(ब),
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२. दिनांक: ६ जानेवारी, २००१.

वाचा:- १) शासन पत्र क्र.पीडीई ५८८९/३०६/(३०६)/पोल-६ब, दि.६.१.१९९०.
२) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे परिपत्रक क्र.१०/१६२८, दिनांक-११.१.१९९०.
३) शासन पत्र क्र.पीडीई-५८९१/१४७४/(२६८)/पोल-६ब, दि.७.१.१९९२.
४) शासन पत्र क्र.पीडीई-५८९१/१४७४/(२६८)/पोल-६ब, दि.२६.११.१९९८.

## परिपत्रक

वर्ग- ३ व ४ चे शासकीय कर्मचारी यांच्या विभागीय चौकशा त्वरेने पूर्ण करण्यासाठी सामान्य प्रशासन विभागाने शासन निर्णय क्र.सीडीआर-११८७/५१८१/४५/अकरा, दि.२९.१२.१९८८ अन्वये "विशेष अधिकारी, विभागीय चौकशा" यांची पदे निर्माण केल्यानंतर पोलीस निरीक्षक व त्याहून कमी दर्जाच्या पोलीस अधिकारी/कर्मचारी यांच्या विरुध्दची विभागीय चौकशीची प्रकरणे विशेष अधिकारी, विभागीय चौकशा यांचेकडे सोपविण्याबाबत शासन परिपत्रक क्र.पीडीई ५८८९/३०६/पोल- ६ब, दिनांक ६.१.१९९० अन्वये पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना सूचना देण्यात आल्या होत्या. त्यानुसार त्यांनी विभागीय चौकशी प्रकरणे परिपत्रक क्र.१०/१६२८, दि.११.१.१९९० अनुसार विशेष अधिकारी, विभागीय चौकशा यांचेकडे सुपूर्द करण्याचे आदेशित केले.

२. शासकीय कर्मचा-यांना महाराष्ट्र नागरी सेवा (शिस्त व अपील) नियम, १९७९ लागू होतात, तर पोलीस निरीक्षक व त्याखालील दर्जाच्या पोलीस अधिकारी व कर्मचारी यांना मुंबई पोलीस (शिक्षा व अपीले) १९५६ हे नियम लागू होतात. पोलीस अधिकारी/कर्मचारी यांच्या विरुध्दचे विभागीय चौकशीचे कामकाज हे प्रामुख्याने पोलीस ठाण्यातील कामकाजाचे प्रचलित नियम, गुन्हयांच्या तपासाबाबत असलेले कायदे व नियम यांच्यावर आधारित असल्यामुळे आणि त्यातील गुंतागुंत व तांत्रिकदृष्टया होत असलेली बिकटता विचारात घेऊन विभागीय चौकशीची प्रकरणे अधिक सुकरतेने व त्वरेने निकाली काढण्याची शक्यता गृहित धरुन तसेच सदर पोलीस अधिकारी/कर्मचारी यांच्या विरुध्दच्या विभागीय चौकशा हया त्यांचेसाठी स्वतंत्रपणे तयार करण्यात आलेल्या "मुंबई पोलीस (शिक्षा व अपिले) नियम,

१९५६" मधील तरतुदींनुसार केल्या जात असल्याने शासनाने उपरोक्त पोलीस अधिकारी/कर्मचारी यांच्या विरुध्दची विभागीय चौकशीची प्रकरणे शासन पत्र क्र.पीडीई ५८९१/१४७४/(२६८)/पोल-६ब, दि.२६.११.१९९८ अन्वये पुन्हा पोलीस खात्यातील अधिका-यांकडे सुपूर्द करण्यासाठी तत्वतः मान्यता दिली. मात्र त्यावेळी दि.६.१.१९९० चे शासन आदेश व पोलीस महासंचालक यांचे दि.११.१.१९९० च्या परिपत्रकातील सूचना रद्द करुन पूर्वलक्षी न देता त्या कालावधीतील विभागीय चौकशीची काही प्रकरणे सामान्य प्रशासन विभागाने नियुक्त केलेल्या विशेष अधिकारी, विभागीय चौकशा ऐवजी ती पोलीस अधिका-यांकडे सोपविण्यात आल्यामुळे अशी विभागीय चौकशीची काही आव्हानीत प्रकरणे नियमबाह्य असल्याचे महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरणाने आदेश दिले. त्यामुळे पोलीस अधिकारी/कर्मचारी यांचेविरुध्दची विभागीय चौकशीची प्रकरणे पूर्वलक्षी प्रभावाने पोलीस अधिका-यांकडे देण्यासंबंधीची बाब शासनस्तरावर विचाराधीन होती.

३. उपरोक्त बाबी विचारात घेऊन सामान्य प्रशासन विभागाच्या शासन निर्णय क्र.सीडीआर-११८७/५९८१/४५/अकरा, दि.२९.१२.१९८८ च्या अनुषंगाने संदर्भित दि.६.१.९०, दि.७.१.९२ व दि.२६.११.९८ च्या शासन पत्रान्वये गृह विभागाने दिलेल्या सूचना/आदेश व त्या संबंधातील पोलीस महासंचालक यांनी पारीत केलेले दि.११.१.९० चे संदर्भित परिपत्रक याद्वारे रद्द करण्यात येत आहेत व पोलीस दलातील पोलीस निरीक्षक (वर्ग-२) व त्याखालील अधिकारी/कर्मचारी यांच्या विरुध्दच्या विभागीय चौकशीचे कामकाज पूर्वीप्रमाणे पोलीस विभागातील सक्षम अधिका-यांकडे सुपूर्द करण्यात येत आहेत. मात्र उपरोक्त संदर्भित पत्रान्वये त्या-त्या वेळी विशेष अधिकारी, विभागीय चौकशा तसेच पोलीस अधिकारी यांचेकडे सोपविण्यात आलेली विभागीय चौकशीची प्रकरणे त्यांनी निकाली काढली असतील अथवा प्रलंबित असतील ती प्रकरणे त्यांनीच निकाली काढायची असल्याने संदर्भित पत्रे/परिपत्रक जरी रद्द करण्यात आली असली तरी त्यामुळे अशा प्रकरणी कोणतीही बाधा निर्माण होऊ शकणार नाही किंवा त्या कालावधीत पोलीस अधिकाऱ्याने केलेली चौकशी रद्दबातल होणार नाही.

४. त्यानुसार पोलीस महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई, पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई व महासंचालक, ॲन्टी करप्शन ब्युरो, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख (शिस्तभंग प्राधिकारी) यांनी त्यांच्या कार्यालयातील विभागीय चौकशींची नवीन प्रकरणे तसेच प्रलंबित असलेली प्रकरणे खालील निर्देशित संबंधित अधिका-यांकडे पाठविण्यासंबंधीची कार्यवाही करावी. प्रलंबित प्रकरणे पाठविण्यापूर्वी खालील सूचना लक्षात घेणे आवश्यक आहे.

(अ) ज्या प्रलंबित विभागीय चौकशीची प्रकरणे विशेष अधिकारी, विभागीय चौकशा यांच्याकडे सोपविलेल्या असतील व ज्यामध्ये साक्षी नोंदविण्याची कार्यवाही सुरु झालेली नाही अशी प्रकरणे पोलीस अधिका-यांकडे सोपविण्यात यावीत.

(ब) ज्या प्रकरणांत प्रगती झालेली आहे. म्हणजे जी प्रकरणे केवळ सादरकर्ता अधिकारी किंवा अपचारी यांनी लेखी टांचणे दिली नाहीत म्हणून प्रलंबित आहेत किंवा जेथे साक्षींना सुरुवात झाली आहे किंवा साक्षी पूर्ण झाल्या आहेत. अशी विभागीय चौकशीची प्रकरणे विशेष अधिकारी, विभागीय चौकशा यांचेकडे प्रलंबित असतील तर ती त्यांनीच सत्वर निकाली काढावीत.

५. पोलीस अधिकारी/कर्मचारी यांच्या विभागीय चौकशा करण्यास खाली नमूद केल्याप्रमाणे पोलीस अधिकारी सक्षम राहतील.

| अ. क्र. | ज्याच्याविरुध्द शिस्तभंगाची कारवाई प्रस्तावित केली आहे त्या कर्मचा-यांचे पदनाम. | विभागीय चौकशी करण्यास सक्षम असलेल्या अधिका-यांचा किमान दर्जा. |
|---|---|---|
| १. | २. | ३. |
| १ | पोलीस निरीक्षक | सहाय्यक पोलीस आयुक्त/पोलीस उपअधीक्षक/ उपविभागीय पोलीस अधिकारी/सहाय्यक समादेशक/ अतिरिक्त उप आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग/ अतिरिक्त पोलीस अधीक्षक, गुन्हा अन्वेषण विभाग/अपर पोलीस उप आयुक्त/अपर पोलीस अधीक्षक, ॲन्टी करप्शन ब्युरो/ सहाय्यक संचालक/उप प्राचार्य किंवा सहाय्यक पोलीस आयुक्त दर्जाचा कोणताही अधिकारी. (पोलीस बिनतारी संदेश विभाग व पोलीस मोटार परिवहन विभागासहित सर्व) |
| २ | सहाय्यक पोलीस निरीक्षक | -- वरीलप्रमाणे -- |
| ३ | पोलीस उप निरीक्षक | -- वरीलप्रमाणे -- |
| ४ | सहाय्यक पोलीस उपनिरीक्षक | पोलीस निरीक्षक/सहाय्यक आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग/ पोलीस उप अधीक्षक, गुन्हे अन्वेषण विभाग/ सहाय्यक पोलीस आयुक्त किंवा पोलीस उप अधीक्षक, ॲन्टी करप्शन ब्युरो किंवा पोलीस निरीक्षक दर्जाचा अधिकारी (पोलीस बिनतारी संदेश विभाग व पोलीस मोटार परिवहन विभागासहित सर्व) |
| ५ | पोलीस हवालदार | -- वरीलप्रमाणे -- |
| ६ | पोलीस नाईक | -- वरीलप्रमाणे -- |
| ७ | पोलीस शिपाई | -- वरीलप्रमाणे -- |

६. पोलीस अधिकारी/कर्मचारी यांचेविरुध्दचा कसूरी अहवाल आवश्यक कार्यवाहीसाठी ज्या अधिकाऱ्याने शिस्तभंग प्राधिकाऱ्याकडे सादर केला असेल त्या अधिकाऱ्याकडे अशा प्रकरणाच्या चौकशीचे काम न देता ते वरील नमूद केलेल्या अन्य अधिकाऱ्याकडे सोपविण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(ना. रा. शेरे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

H-1076(1000-1-01)2

GR-2002C1241234470C

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई,
महासंचालक, ॲन्टी करप्शन ब्युरो, महाराष्ट्र राज्य, मुंबई-२५,
अपर पोलीस महासंचालक, गुन्हा अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे,
आयुक्त व विशेष पोलीस महानिरीक्षक, राज्य गुप्तवार्ता विभाग, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
पोलीस आयुक्त, पुणे शहर/ठाणे शहर/नागपूर/सोलापूर/नाशिक शहर/औरंगाबाद शहर/
नवी मुंबई/रेल्वेज, मुंबई,
विशेष पोलीस महानिरीक्षक, ठाणे परिक्षेत्र/नवी मुंबई/नाशिक परिक्षेत्र/कोल्हापूर परिक्षेत्र/
औरंगाबाद परिक्षेत्र/नांदेड परिक्षेत्र/अमरावती परिक्षेत्र/नागपूर परिक्षेत्र,
विशेष पोलीस महानिरीक्षक, रेल्वेज, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
विशेष पोलीस महानिरीक्षक, राज्य राखीव पोलीस बल, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
विशेष पोलीस महानिरीक्षक, नक्षलविरोधी अभियान, नागपूर,
संचालक व विशेष पोलीस महानिरीक्षक, पोलीस बिनतारी संदेश, महाराष्ट्र राज्य, पुणे,
प्राचार्य, पोलीस प्रशिक्षण महाविद्यालय, नाशिक,
पोलीस उपमहानिरीक्षक, मोटार परिवहन, पुणे,
सर्व पोलीस अधीक्षक,
सर्व प्राचार्य, प्रादेशिक पोलीस प्रशिक्षण शाळा,
सर्व समादेशक, राज्य राखीव पोलीस बल गट,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व विशेष अधिकारी, विभागीय चौकशा,
सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन ११), मंत्रालय, मुंबई,
वित्त विभाग,
गृह विभागातील पोलीस कक्षाशी संबंधित सर्व कार्यासने,
निवडनस्ती (पोल ६ब/अ).

.....

H-1076(1000-1-01)2a.